**मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना - २.० "शेतकऱ्यांच्या शेतीपंपाना दिवसा अखंडीत व शाश्वत वीज पुरवठा करण्याचा शासनाचा महत्वाकांक्षी उपक्रम राबविण्याकरीता विशेष कार्यगट (Task Force) ची स्थापना करण्याबाबत."**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०२५/प्र.क्र.११०/ऊर्जा-७**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०५ जून, २०२५.

**वाचा :-**

१. उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग शासन निर्णय क्र. सौरप्र-२०२३/प्र.क्र.९५/ऊर्जा-७, दि. ०८.०५.२०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात मार्च २४ अखेर ४७.४१ लाख कृषी पंप ग्राहक आहेत. सदर ग्राहकांना महावितरण कंपनी मार्फत वीज पुरवठा करण्यात येतो.ऊर्जेच्या एकूण वापरापैकी सुमारे ३० टक्के उर्जेचा वापर कृषी क्षेत्रासाठी होतो. कृषी ग्राहकांचा सध्याचा एकूण वार्षिक वीज वापर ३९,२४६ द.ल.यू. आहे. सद्य:स्थितीत मा.महाराष्ट्र राज्य नियामक आयोगाच्या निर्देशानुसार संपूर्ण राज्यात कृषी वाहिन्यांवरील शेतकऱ्यांच्या कृषी पंपांना रात्रीच्या काळात दहा/आठ तास किंवा दिवसा आठ तास थ्री फेज विजेची उपलब्धता चक्राकार पद्धतीने करण्यात येते.

राज्यातील शेतकऱ्यांना माफक दरात व त्यांच्या सोयीनुसार दिवसा अखंडित व भरवशाचा वीज पुरवठा उपलब्ध व्हावा या दृष्टिकोनातून ज्या ग्रामीण भागामध्ये गावठाण व कृषी वीज वाहिनीचे विलगीकरण झाले आहे, अशा ठिकाणी कृषी वीज वाहिनीचे सौर उर्जेद्वारे विद्युतीकरण करण्यासाठी दिनांक १४ जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये "मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना" सुरू करण्यात आली.सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन दिनांक १७ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये त्यात सुधारणा करण्यात आल्या आहेत.

मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेतील तांत्रिक, आर्थिक व कार्यपद्धती विषयक आव्हाने दूर करून या योजनेची जलद गतीने व प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरिता शासन निर्णय क्र.:सौरप्र-२०२३/प्र.क्र.९५/ऊर्जा-७, दि.०८.०५.२०२३ अन्वये "मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी २.० योजना" सुरू करण्यात आली आहे. राज्यामध्ये कृषी क्षेत्रासाठी ऊर्जेची मागणी १६,००० मेगावॅट आहे. शेतकऱ्यांना दिवसा शाश्वत व भरवश्याची ऊर्जा उपलब्ध व्हावी म्हणून २७ जिल्ह्यांमध्ये २७७९ विद्युत उपकेंद्रांसाठी (Sub Station) सौर प्रकल्प हाती घेण्यात आले आहेत. या सर्व प्रकल्पांची निविदा प्रक्रिया पूर्ण करून कामे सुरू झाली आहेत आणि हे सर्व प्रकल्प ऑक्टोबर, २०२६ पर्यंत पूर्ण होणार आहेत.

तसेच केंद्रशासनाने १ कोटी घरकुलांना रुफ टॉप सोलर संच बसविण्याच्या उद्देशाने दि.२९.०२.२०२४ रोजी प्रधानमंत्री सुर्यघर मुफ्त बिजली योजना सुरू केली आहे. या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्याला २०२६-२७ पर्यंत ३५०० मे.वॅट क्षमतेचे रुफ टॉप सोलर संच आस्थापित करण्याचे उद्दीष्ट दिले आहे.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २४.०४.२०२५ रोजी सह्याद्री अतिथीगृह, मलबार हिल, मुंबई येथे मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना २.० या योजनेचा आढावा घेण्यासाठी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीस सर्व संबंधित विभागांचे सचिव,सर्व जिल्हाधिकारी आणि शासनाच्या ऊर्जा विभागाशी निगडीत कंपन्यांचे वरिष्ठ अधिकारी, विकासक कंपन्यांचे संचालक/प्रतिनिधी उपस्थित होते.

सदर बैठकीत मा.मुख्यमंत्री यांनी प्रत्येक जिल्ह्यातील सौर ऊर्जा प्रकल्पांचा आढावा व प्रगतीचे पुर्नविलोकन करण्याकरिता जिल्ह्याधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर विशेष कार्यगट (Task Force) नेमण्याच्या सुचना दिल्या.

**शासन निर्णय:-**

मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी-२.० उपक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक जिल्हास्तरावर विशेष कार्यगट (Task Force) स्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. **विशेष कार्यगट (Task Force) समितीची रचना:-**

| **अ.क्र.** | **सदस्य** | **पदनाम** |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद | सदस्य |
| ३. | जिल्हा पोलिस अधिक्षक | सदस्य |
| ४. | विभागीय वन अधिकारी | सदस्य |
| ५. | अतिरिक्त जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय | सदस्य सचिव |
| ६. | जिल्हा भुसंपादन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय | सदस्य |
| ७. | मुख्य अभियंता,महानिर्मिती कंपनी | सदस्य |
| ८. | अधिक्षक अभियंता,महावितरण कंपनी | सदस्य |
| ९. | जिल्हा विद्युत निरिक्षक, विद्युत निरक्षनालय | सदस्य |
| १०. | व्यवस्थापक,जिल्हास्तरीय कार्यालय, महाऊर्जा | सदस्य |
| ११. | संबंधित प्रकल्प अंमलबजावणी एजन्सी (विकासक) यांचे प्रतिनिधी | सदस्य |

**४.** विशेष कार्यगट (Task Force) ची कार्यकक्षा:-

१. जिल्ह्यात राबविण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेअंतर्गत सौर प्रकल्पाकरिता विकासकांना हस्तांतरीत केलेल्या शासकीय/ तसेच खाजगी जमिनीसंदर्भातील विविध प्रकारच्या परवानग्या व नाहरकत प्रमाणपत्र यांचा आढावा घेणे.

२. सदर प्रकल्पाकरिता प्रदान केलेल्या जमिनीवर विविध यंत्रणाकडून अथवा स्थानिक लोकांकडून उभारण्यात येणारे अडथळे/अतिक्रमण दूर करणे.

३. योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे व प्रगतीचे पुर्नविलोकन करणे.

४. RoW चे प्रश्न व वन विभागाशी निगडीत मुद्यांबाबत निराकरण करणे.

५. विकासकांच्या अडचणी दूर करणे व प्रकल्प गतीमानतेने कार्यरत करण्याकरिता सक्रियतेने कार्यवाही करणे.

६. प्रधानमंत्री सुर्यघर मुफ्त बिजली योजनेच्या प्रगतीचा आढावा घेणे तसेच शासकीय कार्यालयाच्या इमारतीवर रुफ टॉप सोलर आस्थापित करण्याचा कृती आराखडा तयार करुन त्याची देखरेख करणे व जिल्ह्याकरिता ठरविण्यात आलेला लक्षांक पूर्ण करणे. त्या करीता आंतर एजन्सी समन्वय करणे.

५. सदर विशेष कार्यगटाचे सदस्य सचिव, जिल्हाधिकारी कार्यालय यांनी अध्यक्षांच्या सूचनेनुसार दर महिन्याला नियमितपणे बैठकीचे नियोजन करावे व सदर बैठकीचा अहवाल मा.मुख्य सचिव महाराष्ट्र शासन व अपर मुख्य सचिव (ऊर्जा) यांना सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०६०५१३१४४७१७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2025.06.05 13:15:48 +05'30'

**(ना.श्री.कराड)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, सभापती/उपसभापती विधानपरिषद, यांचे सचिव, मुंबई
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मंत्री (अपारंपारिक ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
१०. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई.
११. मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३. अपर मुख्य सचिव (वने) महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
१४. अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा कामगार व खनिकर्म विभाग मंत्रालय, मुंबई-३२
१५. प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१८. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१९ अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई.
२०. महासंचालक, महाऊर्जा,पूणे
२१. सर्व जिल्हाधिकारी
२२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
२३. सर्व जिल्हा पोलिस अधिक्षक, गृह विभाग
२४. सर्व विभागीय वन अधिकारी, वन विभाग
२५. सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
२६. सर्व जिल्हा भुसंपादन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
२७. सर्व मुख्य अभियंता,महानिर्मिती कंपनी
२८. सर्व अधिक्षक अभियंता, महावितरण कंपनी
२९. सर्व विद्युत निरिक्षक, सर्व विद्युत निरिक्षक कार्यालय
३०. सर्व व्यवस्थापक, जिल्हास्तरीय कार्यालय, महाऊर्जा
३१. संबंधित प्रकल्प अंमलबजावणी एजन्सी (विकासक) यांचे प्रतिनिधी, द्वारा महावितरण कंपनी
३२. कार्यासन अधिकारी (ऊर्जा-१/३/५/७), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३३. निवड नस्ती (ऊर्जा-७), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.